उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील, बाष्पके संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा आकृतीबंध.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय शुद्धिपत्रक क्र. बाष्पके-०२१६/प्र.क्र.९/कामगार-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २० मार्च, २०२३.

**पहा:** समक्रमांकाचा शासन निर्णय दि.११ फेब्रुवारी, २०२१.

**प्रस्तावना-**

बाष्पके संचालनालयाच्या आस्थापनेवरील "प्रणाली विश्लेषक (सिस्टीम ॲनालिस्ट)" या पदाचा समावेश गट-ब (अराजपत्रित) मध्ये करण्यास सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिली आहे. तसेच, वित्त विभागाने सदर पदास "एस:१४:३८६००-१२२८००" हा वेतनस्तर मंजूर केला असून, "सदर पदास वित्त विभागाच्या दि.२ मार्च २०१९ च्या शासन निर्णयानुसार एकाकी पदाचे लाभ अनुज्ञेय राहतील", असे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार सदर पदाचा वेतनस्तर बदलण्याच्या अनुषंगाने शुद्धिपत्रक निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय शुद्धिपत्रक-**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये, बाष्पके संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील परि.२ मधील तक्त्यातील स्तंभ क्र.३ च्या "वेतनश्रेणी" या शीर्षकाऐवजी "वेतनस्तर" असे शीर्षक वाचण्यात यावे. तसेच, "प्रणाली विश्लेषक (सिस्टीम ॲनालिस्ट)" या पदाचा समावेश गट-ब (अराजपत्रित) मध्ये करण्यात येऊन सदर शासन निर्णयातील परि.२ मधील तक्त्यातील अ.क्र.१५ येथे स्तंभ क्र.३ मध्ये सदर पदाच्या "एस:१६:४४९००-१४२४००" या वेतनस्तराऐवजी, "एस:१४:३८६००-१२२८००" हा वेतनस्तर वाचण्यात यावा.

२. प्रस्तुतचे शासन निर्णय शुद्धिपत्रक, सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.,१०१८/२०२१/का.१२, दि.२६.४.२०२२, वित्त विभागाच्या सेवा-९ कार्यासनाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४१/सेवा-९/२०२२, दि.६.६.२०२२ आणि सेवा-३ कार्यासनाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२४४/२२/सेवा-३, दि.१५.६.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०२३०३२११४५३०५४५१० असा आहे. हे शुद्धिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, pseudonym=873F0744FC52A040F02A5627B7E5D792D665CCD9, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2023.03.21 15:00:30 +05'30'

**(अशोक मांडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत माहितीस्तव,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३) मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
४) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक.

**प्रति,**

१) संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई.
२) सर्व प्रादेशिक विभाग प्रमुख, बाष्पके (द्वारा: संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१/महाराष्ट्र-२, मुंबई/नागपूर.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७) सामान्य प्रशासन विभाग/ का.१२.
८) वित्त विभाग, आपुक/सेवा-९/अर्थसंकल्प-१४/व्यय-१६, मंत्रालय, मुंबई.
९) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती.